GR-200409213502800l-0500

नोंदणी व मुद्रांक विभाग

**बँका, पोस्ट ऑफीसेस व तत्सम वित्तीय संस्था की, ज्यावर शासन/रिझर्व्ह बँन्क ऑफ इंडीया यांचे नियंत्रण आहे अशा संस्थांना मुद्रांक विक्रेते म्हणून नेमणूक करुन त्यांचेमार्फत मुद्रांकाचे वितरण करण्याबाबत.**

महाराष्ट्र शासन
महसूल व वन विभाग,
शासन निर्णय क्र. मुद्रांक-२००३/१३५८/प्र.क्र.३५६/म-१
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : २६ मार्च, २००४

**पार्श्वभूमि:-**

नोंदणी व मुद्रांक विभाग हा नोंदणी फी व मुद्रांक शुल्कापासून शासनाला मोठ्या प्रमाणावर महसूल मिळवून देणारा महत्वाचा विभाग आहे. या विभागाकडून शासनाला दरवर्षी सुमारे रु.३००० कोटी इतका महसूल मिळतो. या विभागाचे प्रमुख कार्य स्थावर मालमत्तेच्या खरेदी विक्री व्यवहारांचे दस्त नोंदविणे व त्यांचे जतन करणे हे आहे. त्याकरिता लागणा-या मुद्रांकाची विक्री बृहन्मुंबईमध्ये प्रधान मुद्रांक कार्यालय, अधिकृत परवानाधारक मुद्रांक विक्रेते व विस्तारीत कक्ष यांचेमार्फत तर इतर ठिकाणी कोषागारामार्फत तसेच अधिकृत परवानाधारक मुद्रांक विक्रेत्यांकडून करण्यात येते. सद्या राज्यात मुद्रांक विभागाच्या कार्यालयामध्ये २३७ फ्रॅन्कींग मशीन (दस्त मुद्रांकित करण्याची यंत्रे) कार्यरत असून अन्य संस्थांमध्ये ३९१ फ्रॅन्कींग मशीन (दस्त मुद्रांकित करण्याची यंत्रे) वापरण्यास परवानगी देण्यात आली आहे

**शासन निर्णय :-**

२. बनावट मुद्रांक विक्री प्रकरण उघडकीस आल्यानंतर असे दिसून आले आहे की, सद्या राबविण्यात येत असलेली उपाययोजना कालबाहय झाली आहे. याकरिता मुद्रांक विक्रीत सुटसुटीतपणा व विश्वासार्हता निर्माण होणे आवश्यक आहे. जनतेची व पर्यायाने शासनाची फसवणूक होवू नये तसेच जनतेला मुद्रांक त्वरीत उपलब्ध व्हावे म्हणून सुरक्षित मुद्रांक विक्री होण्यासाठी बॅंका, पोस्ट ऑफीसेस व तत्सम वित्तीय संस्था की ज्या संस्थांवर शासन/रिझर्व्ह बॅंन्क ऑफ इंडिया यांचे नियंत्रण आहे त्यांना मुद्रांक विक्रेते म्हणून नेमणूक करण्याबाबतचा प्रश्न शासनाच्या विचाराधीन होता. याबाबत सारासार विचारांती शासनाची अशी खात्री झाली आहे की, राज्यात बॅन्का, पोस्ट ऑफीसेस व तत्सम वित्तीय संस्था ज्यावर शासन/रिझर्व्ह बॅन्क ऑफ इंडिया यांचे नियंत्रण आहे त्यांच्याकडून दैनंदिन मुद्रांकाची विक्री झाल्यास दैनिक व्यवहार जनताभिमुख व तत्पर होतील तसेच नागरीकांना सोयीस्कर व विश्वसनिय सुविधा देणे शक्य होईल. त्या अनुषंगाने राष्ट्रीयकृत बॅन्का, शेडयुल बँका, सहकार आयुक्त यांनी "अ" वर्गवारी दिलेल्या सहकारी बँका, पोस्ट ऑफीसेस व तत्सम वित्तीय संस्था ज्यावर शासन/रिझर्व्ह बॅन्क ऑफ इंडीया यांचे नियंत्रण आहे अशा संस्थांना सर्वच दस्ताना मुद्रांकीत करण्याचे अधिकार देण्यात यावेत.असा शासनाने निर्णय घेतलेला आहे. त्याकरिता संबंधीत संस्थांना खालील अटींचे पालन करणे बंधनकारक राहील.

१) मुख्य नियंत्रक महसूल प्राधिकारी यांचे आदेश क्र.१२७०/९४/१८२०-२१, दि.१२/८/९४ अन्वये फ्रँकिंग मशीन (दस्त मुद्रांकित करण्याची यंत्रे) बाबत केलेल्या नियमावली मधील तरतुदी व तदनुषंगाने त्यांनी वेळोवेळी केलेल्या सुधारणांचे पालन करणे आवश्यक राहील.

२) दस्त मुद्रांकित करण्याच्या यंत्राने मुद्रांकित केलेल्या मुद्रांकाच्या रकमेवर सरसकट १% मनौती शासनातर्फे देय राहील. त्या व्यतिरिक्त मुद्रांकित प्रति दस्तासाठी रु.१०/- अशा पध्दतीने सेवा शुल्क जनतेकडून घेण्यास सदर संस्थांना परवानगी असेल. १% मनौतीची रक्कम ही मशीन लोड करताना देता येईल. उदा.रुपये १ लाख मशीनमध्ये लोड करताना बॅंकेला प्रत्यक्ष भरणा रु.९९,०००/- चा करावा लागेल.

३) दस्त मुद्रांकित करण्याच्या यंत्राची खरेदी बँकांना स्वखर्चाने करावी लागेल. ज्या मशिनमध्ये सर्व सुरक्षा चिन्हांचा (Security Features) समावेश असेल केवळ अशाच मशीनला मान्यता देण्यात येईल.

४) डाटा एंट्रीचा नमुना नोंदणी व मुद्रांक विभाग देईल. विभागाने दिलेल्या डाटा एंट्रीच्या नमुन्यातच नोंदी ठेवाव्या लागतील

रोटा प्रिंट/एच–1234(1500–3–04)1

व हा डाटा दररोज डायलअप पध्दतीने मुख्य नियंत्रक महसूल प्राधिकारी यांचेकडे पाठवावा लागेल. त्याच दिवशी डाटा आला नाही तर दुस-या दिवशी मशिन लॉक केली जाईल.

५) मशीन लोडींग करण्यासाठी आवश्यक रकमेचा भरणा डी.डी./ पेऑर्डर /बॅन्कर्स चेकने करावा लागेल.

६) भविष्यात मशीनच्या गैरवापरामुळे काही नुकसान झाल्यास त्याच्या भरपाईबाबत संबंधित संस्थांना करारासोबत Legal Undertaking द्यावे लागेल. सोबत प्रत जोडली आहे.

७) दस्त मुद्रांकित करण्याचे यंत्र लोड करण्यासाठी सर्व बॅन्का/तत्सम वित्तीय संस्था यांना अगोदर पैसे भरावे लागणार आहेत. यास्तव त्यांना जनतेकडून प्रतिदस्त रु.१०/- सेवाशुल्क म्हणून वसूल करण्यास परवानगी असेल.

८) पोस्ट ऑफीसेस ही भारत सरकारच्या अधिपत्याखाली येत असल्यामुळे दस्त मुद्रांकीत करण्याचे यंत्र लोड करण्यासाठी त्यांना अगोदर रक्कम भरण्याच्या प्रक्रियेतून सूट असेल पोस्ट ऑफीसेसनी जनतेकडून रु.१०/- सेवाशुल्क न घेता १% मनौती (कमिशन) या तत्वावर दस्त मुद्रांकीत करावेत.

३. शासनाने प्रस्तावित केल्याप्रमाणे १% मनौतीस (कमिशन) पोस्ट खात्याने तत्वत: मान्यता दिलेली आहे. तसेच पथदर्शी तत्त्वावर ३ महिन्यापर्यंत ही योजना पोस्ट खात्यामार्फत राबविण्यात येईल, कारण पोस्ट संचालनालय, दिल्ली यांचेकडून याबाबत त्यांना मान्यता प्राप्त करुन घ्यावी लागेल व त्यानंतर मनौतीच्या (कमिशनच्या) दराबाबत फेरविचार करता येईल.

४. नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक तथा मुख्य नियंत्रक महसूल अधिकारी पुणे हे सर्व संबंधितांबरोबर विचारविनिमय करुन **दि. १ एप्रिल २००४ पासून** दस्त मुद्रांकित करण्याची सेवा जनतेस उपलब्ध करुन देण्याच्या दृष्टीने पुढील कार्यवाही करतील.

हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनुमतीने व त्यांचेकडील अनौपचारिक संदर्भ क्र.प्रकरण ११०/ ०४/ व्यय-१०, दि.६/२/२००४ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**( रमाकान्त असमार )**
सह सचिव
महसूल व वन विभाग.

**सहपत्र : हमीपत्राचा नमुना**

प्रति,

नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक, महाराष्ट्र राज्य, पुणे.
सर्व विभागीय आयुक्त /सर्व जिल्हाधिकारी तथा जिल्हा निबंधक
मुद्रांक अधिक्षक, मुंबई
संचालक, नगररचना, पुणे
सर्व विभागीय नोंदणी उपमहानिरीक्षक व मुद्रांक उपनियंत्रक
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)महाराष्ट्र, मुंबई / नागपूर
महालेखापाल (लेखापरीक्षा)महाराष्ट्र, मुंबई / नागपूर
संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
सर्व सह जिल्हा निबंधक/सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
दुय्यम निबंधक व प्रशासकीय अधिकारी, मुंबई/बांद्रा
सर्व उपजिल्हाधिकारी (मुद्रांक व मुल्यांकन)/ निवासी लेखाधिकारी, मुंबई
शासकीय छायाचित्रण नोंदणी कार्यालय, पुणे
सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
सर्व कार्यासने, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२.
वित्त विभाग (व्यय-१०)/(वित्तीय सुधारणा), मंत्रालय, मुंबई-४०००३२.
निवडनस्ती (म-१ कार्यासन), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.

मन-1234(1500-3-04)ग

## Encloser of

G R. No. Mudrank 2003/1358/C.R.356/M-1, Dated the 26th March, 2004

UNDERTAKING AND INDEMNITY BOND

This INDEMNITY BOND is made and executed at ________________on this ______________day of __________200 by ______________________________ ______________ registered under ____________________________Act having registration No. __________and having registered office at ________________, represented by Shri/Shrimati___________________________age____years, Official Designation ________________hereinafter referred to or called as THE AUTHORISED USER/VENDOR ( which expression unless repugnant to the context or meaning thereof shall mean and include ____________________________(as suitable for concerned party).

IN FAVOUR OF THE GOVERNOR OF MAHARASHTRA acting through the Chief Controlling Revenue Authority, Maharashtra State Pune hereinafter referred to or called as THE GOVERNMENT (which expression unless repugnant to the context or meaning thereof shall mean and include Government of Maharashtra and its duly authorised representatives).

WHEREAS

A The Authorised User/Vendor is carrying on the business of ________________, has approached the Government for the use of machine to impress ________________non-judicial stamps, required for their own use/to vend to the public.

B And the Authorised User/vendor is ready to pay the stamp duty In advance and also pay the cost of the machine directly to the Manufacturer or as may be prescribed by the Government.

C And in order to expedite the process of stamping of the relevant Instruments, the Government has decided to permit the Authorised User/Vendor to use Machine to impress aforesaid Non-judicial stamps to denote payment of stamp duty, on certain conditions.

D And the Authorised User/Vendor has agreed to fulfill all the conditions as required by law, and also to undertake and keep indemnified the Government against all or any losses suffered by the Government due to any mishandling, misconduct, negligence or any irregularity of any kind whatsoever caused by the Authorised User/Vendor.

E And the Government, before authorising the manufacturer for supply of Machine to the Authorised User/Vendor deems it necessary to get assured and indemnified from the Authorised User/Vendor as to obedience and observance of terms and conditions that are prescribed by the Government vide C.C.R.A.'s order bearing No. __________dated__________ for the use of the Franking Machine.

F The Authorised User/Vendor to fulfill the aforesaid requirement And in order to undertakes, and indemnify the Government, is Executing this presents as follows :-

NOW THEREFORE THIS DEED OF UNDERTAKING CUM INDEMNITY BOND WITHNESSETH AS FOLLOWS:-

1. The Authorised user/Vendor hereby undertakes that the Franking Machine (s) will be located at the following address : ______________________ and shall be available for inspection at all reasonable times by any official of the Office of the Chief Controlling Revenue Authorty, Maharashtra State, Pune or any officer authorised by him in this behalf

without notice. The Authorised User/Vendor also undertakes not to change location of the machine without prior permission in writing of the Authorising authority.

2. The Authorised User/Vendor undertakes to pay the authorisation fee from time to time as prescribed by the Government for allowing the Authorised User/Vendor to use the Machine for payment of stamp duty.

3. The Authorised User/Vendor undertakes to abide by all the terms And conditions as may be prescribed by the Government from time to time as to the use of the Machine and for authorisation thereof.

4. The Authorised User/Vendor shall surrender any worn out or User vice able Machine parts to the authorising authority or any officer authorised by him immediately on replacement.

5. The Authorised User/Vendor shall ensure regular use of the Franking Machine unless there are unavoidable circumstances for non use of the same the intimation in respect of which will be given to the authorising authority, failing which the machine shall vest in the authorising authority and shall stand confiscated.

6. The Authorised User/Vendor undertakes to pay the required stamp value in advance to the Government and accordingly the Government will load/increment the machine for that value.

7. The Authorised User/Vendor undertakes to send the data from Utilization of the machine on each working day to the officer to whom he is directed to supply the information. The Authorised User/Vendor undertakes that, he shall not complain if the machine is locked for the reasons of non compliances of any of the conditions inclusive of sending the data entry in prescribed time limit.

8. The Authorised User/Vendor undertakes that, the Authorised User/Vendor or its employees or any persons acting through them directly or indirectly will not dismantle or assemble the machine or to disturb the machine in any manner whatsoever.

9. The Authorised User/Vendor hereby undertakes to keep the Government always indemnified against all or any of the losses, or any third party risk arising out of any mishandling , misconduct, negligence or any irregularity of any kind whatsoever caused by the Authorised User/Vendor while handling or using the machine.

IN WITHNESS WHEREOF THE AUTHORISED USER/VENDOR HEREIN HAVE SET AND SUBSCRIBED ITS RESPECTIVE HANDS AND SEALS ON THE DAY, MONTH AND YEAR FIRST HEREINABOVE WRITTEN.

SIGNED , SEALED AND DELIVERED
by within names Authorised User/Vendor
In the presence of:

1, Signature :
Name :
Address :

2. Signature :
Name :
Address :

